राज्यात नवीन पारेषण प्रकल्प उभारणीसाठी वीजदरावर आधारित स्पर्धात्मक निविदा प्रक्रिया राबविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण -२०१८/ प्र.क्र.२१४/ऊर्जा-४**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : ०४ जानेवारी, २०१९**

**पहावे :- अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी, मुंबई यांचे पत्र क्र. CMD/MSETCL/CO/2019,दिनांक २२.०२.२०१८**

**प्रस्तावना :-**

नवीन पारेषण प्रकल्पांच्या, उभारणीसाठी वीजदरावर आधारीत स्पर्धात्मक बोली (Tarrif Based Competitive Bidding-TBCB) साठी विद्युत मंत्रालय, भारत सरकार, कडून राजपत्र क्रमांक ११/५/२००५-PG(I) दिनांक १३.०४.२००६ रोजी मार्गदर्शक तत्त्वे निर्गमित करण्यात आली आहेत. तसेच ०४.०७.२००७ व दिनांक १०.१०.२००८ रोजी अनुक्रमे वरील दोन्ही राजपत्रान्वये सुधारणा करण्यात आलेल्या आहेत. तसेच दिनांक ०२.०५.२०१२ रोजी निर्गमित केलेल्या सुधारित आदेशान्वये आंतर राज्यीय पारेषण प्रकल्पांसाठी राज्य सरकार या मार्गदर्शक तत्त्वांचा अवलंब करु शकेल किंवा सदर मार्गदर्शक तत्त्वे विचारात घेऊन राज्यातील पारेषण प्रकल्पांच्या सुविधेसाठी अशाच प्रकारच्या समित्या गठीत करु शकेल असे सूचित केले आहे.

वीज दरावर आधारित स्पर्धात्मक निविदा प्रक्रिया राज्यातील पारेषण प्रकल्पांकरिता राबविल्यास पारेषण प्रकल्पांसाठी अत्याधुनिक तंत्रज्ञानाचा वापर करणे शक्य होईल. तसेच सदर प्रक्रिया पारदर्शक असल्यामुळे प्रकल्पाचा दर्जा व कार्यक्षमता सुधारता येईल, पारेषण प्रकल्पांची उभारणी जलद गतीने करता येईल. बाह्य तत्वांवरील विकासकांकडून प्रकल्पांच्या उभारणीसाठी आर्थिक गुंतवणूक होणार असल्यामुळे राज्यावरील आर्थिक भार कमी होईल. त्यानुषंगाने वीज दरावर आधारित स्पर्धात्मक निविदा (टि.बी.सी.बी.)च्या माध्यमातून राज्यात पारेषण प्रकल्पाची कामे करण्यासाठी उपरोक्त केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार अधिकार प्राप्त समिती (Empowered committee) निविदा मूल्यांकन समिती (Bid Evaluation committee ) समित्या गठीत करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने सांगोपांग विचारविनिमय करुन खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यात नवीन पारेषण प्रकल्पांच्या उभारणीसाठी केंद्र शासनाच्या उपरोक्त मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन, वीज दरावर आधारित स्पर्धात्मक निविदा (Tarrif Based Competitive Bidding-TBCB) प्रक्रिया राबविण्याचा निर्णय घेतला असून त्याकरिता सदर प्रक्रियेव्दारे पारेषण प्रकल्पाची कामे करण्यासाठी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार खालीलप्रमाणे अधिकार प्राप्त समिती (Empowered committee) स्थापन करण्यात येत आहे.

१) प्रधान सचिव (ऊर्जा) ..... अध्यक्ष
२) अ.मु.स., (नियोजन) यांचे प्रतिनिधी ..... सदस्य
३) प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग ..... सदस्य
४) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महापारेषण कंपनी ..... सदस्य

५) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महावितरण कंपनी ..... सदस्य

६) ऊर्जा क्षेत्रातील तज्ञ (स्वतंत्र) ..... सदस्य

७) आर्थिक क्षेत्रातील तज्ञ ( स्वतंत्र) ..... सदस्य

८) मुख्य अभियंता (राज्य पारेषण उपक्रम) ..... समन्वय /सदस्य सचिव

उपरोक्त समितीमधील अ.क्र. ६ व ७ साठी ऊर्जा व आर्थिक क्षेत्रातील तज्ञ नेमण्याबाबत स्वतंत्र आदेश यथावकाश निर्गमित करण्यात येतील.

२. सदर समितीची कार्ये खालीलप्रमाणे राहतील:-

अ) राज्यात नवीन पारेषण प्रकल्पांना या योजनेच्या माध्यमातून चालना देणे.

ब) राज्य पारेषण उपक्रमाच्या शिफारशीप्रमाणे पारेषण प्रकल्पाची निवड करणे.

क) प्राप्त निविदांचे मूल्यमापन करण्यास मदत करणे. तसेच निविदा मुल्यांकन समिती (Bid Empowered committee )समिती गठीत करणे.

३. निविदा प्रक्रीयेचे समन्वयन करण्यासाठी निविदा प्रक्रिया समन्वयकाची (Bid process coordinator) नियुक्ती अधिकारप्राप्त समिती (Empowered Committee )करेल. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनानुसार निविदा प्रक्रिया समन्वयकाची कार्य खालीलप्रमाणे राहतील :-

१) केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्तवानुसार निविदा दस्ताऐवज तयार करणे व त्यास योग्य आयोगाची मान्यता प्राप्त करुन घेणे. तसेच Special purpose Vehicle ची निर्मिती करणे, कार्यादेश पत्र देणे.

२) निविदा प्रक्रिया सुरु करण्यासाठी निविदा मूल्यांकन समिती (Bid Empowered committee ) व्दारे संबंधित आयोगास कळविणे.

४. अधिकार प्राप्त समिती (Empowered committee) निविदांचे मूल्यमापन करण्यासाठी निविदा मूल्यांकन समिती (Bid Empowered committee ) समिती गठीत करेल व या गठीत समितीची कार्ये पुढीलप्रमाणे असतील:-

१) निविदा सार्वजनिक स्वरुपात उघडणे व सर्व निविदेच्या प्रतिनिधींना उपस्थित राहण्यासाठी परवानगी देणे.

२) तांत्रिक निविदांचे परीक्षण करणे व निविदा दस्ताऐवजात निश्चित केलेल्या किमान तांत्रिक निकषांची पूर्तता केलेली आहे याची खात्री करणे. तसेच किमान तांत्रिक निकषांची पूर्तता केलेल्या निविदांचा पारेषण शुल्कावर पुढील मूल्यांकनासाठी विचार करणे.

३) पारेषण शुल्क भरलेल्या बोलीच्या दस्ताऐवजात कोणतेही विचलन असल्यास ती बोली नाकारणे.

४) पारेषण शुल्क लावलेल्या निविदेच्या दस्ताऐवजामध्ये काही विचलन आढळल्यास सदर निविदा नाकारणे. मूल्यमापन प्रक्रियेनुसार सर्वात कमी स्तरावरील पारेषण शुल्काचा उल्लेख केलेल्या बोलीदाराला निविदा पुरस्कारासाठी विचारात घेणे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१०४१६४४५६१२१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

J M Nikumbh

Digitally signed by J M Nikumbh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Energy Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bad01beb2b35e1b486ffdc83218a01d8d1d56be637bea65f2ee27e90b1d71e66, cn=J M Nikumbh
Date: 2019.01.05 12:58:51 +05'30'

**( ज.मि.निकुंभ )**
**अवर सचिव, महाराष्ट शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
३) मा. मुख्यसचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४) अ.मु.स. (वित्त) मंत्रालय, मुंबई
५) अ.मु.स. (नियोजन) मंत्रालय, मुंबई
६) सर्व मंत्रालयीन विभाग
७) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या, प्रकाशंगा, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१
८) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी मर्या, प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१
९) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनी मर्या, प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१
१०) मुख्य अभियंता, राज्य पारेषण उपक्रम, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या, प्रकाशंगा, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१